आदिवासी विकास सेवेतील वर्ग-१ संवर्गातील उपायुक्त / उपसंचालक / प्रकल्प अधिकारी (श्रेणी -१) तसेच सहायक आयुक्त / वरिष्ठ संशोधन अधिकारी / प्रकल्प अधिकारी (श्रेणी-२) यांच्या बदलीबाबत .

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन आदेश क्रमांकः बदली-२५१८/प्र.क्र.१०९/का.१५**

**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक**

**मंत्रालय विस्तार, मुंबई-३२.**

**दिनांक: २७ नोव्हेंबर, २०१८**

## शासन आदेश :-

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील नियम ४ (४) मधील तरतुदीनूसार बदली करण्यास सक्षम प्रधिका-याच्या मान्यतेने खालील तक्त्यात नमूद आदिवासी विकास सेवेतील उपायुक्त / उपसंचालक / प्रकल्प अधिकारी (श्रेणी -१) तसेच सहायक आयुक्त / वरिष्ठ संशोधन अधिकारी / प्रकल्प अधिकारी (श्रेणी -२) या संवर्गातील अधिकाऱ्यांची बदलीने त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.(३) मध्ये दर्शविलेल्या पदांवर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिकाऱ्याचे नाव, पदनाम व कार्यालय | बदलीनंतरची पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्रीमती जागृती कुमरे, उप संचालक, अ.ज.प्र. त.स., नाशिक | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय, सोलापूर | मा. उच्च न्यायालयाच्या आदेशान्वये बदली. |
| २. | श्री. रामचंद्र र. सोनकवडे, प्रकल्प अधिकारी, सोलापूर | उप संचालक, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, नाशिक | अ.ज.प्र.त.स.,नाशिक समितीवरील रिक्त पदे भरणे आवश्यक असल्याने. |
| ३ | श्री. अविनाश चव्हाण, वरिष्ठ संशोधन अधिकारी, अ.ज.प्र. त.स., नाशिक | सहायक आयुक्त, आयुक्त, आदिवासी विकास,नाशिक | मा. उच्च न्यायालयाच्या आदेशान्वये बदली. |
| ४ | श्री.अशोक माधवराव वाहणे, वरिष्ठ संशोधन अधिकारी, अ.ज.प्र. त.स., नागपूर | वरिष्ठ संशोधन अधिकारी अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, गडचिरोली | अ.ज.प्र.त.स.,गडचिरोली समितीवरील रिक्त पद भरणे आवश्यक असल्याने |
| ५ | श्री. सचिन जाधव, सहायक आयुक्त, अपर आयुक्तालय, अमरावती | वरिष्ठ संशोधन अधिकारी अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, पुणे | अ.ज.प्र.त.स.,पुणे समितीवरील रिक्त पद भरणे आवश्यक असल्याने. |

२. संबंधित वरिष्ठ अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, बदली करण्यात आलेल्या उपरोक्त अधिकाऱ्यांना बदलीच्या ठिकाणी रुजु होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे, तसेच सदर अधिकाऱ्यांना बदलीच्या ठिकाणी रुजु होण्यासाठी केंव्हा कार्यमुक्त करण्यात आले व ते सदर पदावर कोणत्या दिनांकास रुजु झाले याबाबतची माहिती शासनास त्वरित कळविण्यात यावी.

३. संबंधित अधिकाऱ्यांना शासनाच्या पुर्वपरवानगी शिवाय कोणतीही रजा मंजुर करण्यात येऊ नये.तसेच म.ना.से.(रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) अन्वये सदर अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजा अर्ज मूळ कार्यालयाने स्विकारु नये. असे अर्ज मूळ कार्यालयास प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्याच्या मूळ पत्त्यावर नोंदणीकृत डाकेने पोच करावेत. मूळ कार्यालयाने सदर अर्ज शासनास पाठविल्यास त्याची दखल घेतली जाणार नाही.

४. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास सदर कृती म.ना.से.(वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्याने सदर बाब गैरवर्तणूक समजून संबंधित अधिकाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई सुरु करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२७१७१२४९३९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Govind Mahadeo Mainkar
Date: 2018.11.27 17:20:20 +05'30'

**(गोविंद माईणकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (आ.वि.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.राज्यमंत्री (आ.वि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,

५. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ठाणे/अमरावती/नागपूर,
७. सर्व सहआयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समित्या,
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर,
१०.महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
११.महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/नागपूर / गडचिरोली /नंदुरबार.
१३.सर्व उप सचिव / अवर सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
१५.सर्व कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६.संबंधित अधिकारी,
१७.निवड नस्ती (का.१५).